“स्वागत प्रजासत्ताक दिनाचे..ध्येय समृध्द पर्यावरणाच्या रक्षणाचे.. या उपक्रमांतर्गत राज्यातील शालेय विद्यार्थ्यांना शपथ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०२०/प्र.क्र.२०/एस.डी.-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २१ जानेवारी,२०२०

**संदर्भ** - १) पर्यावरण विभाग,शासन निर्णय क्रमांक इएनव्ही-२०१०/प्र.क्र.८/तांक-३,दिनांक १४ जानेवारी,२०११.
२) मा.मंत्री (पर्यावरण) यांचे दिनांक २०.०१.२०२० चे पत्र.

**शासन परिपत्रक:-**

दिनांक २६ जानेवारी,२०२० या दिवशी आपण भारतीय प्रजासत्ताक दिनाचा ७० वा वर्धापन दिन साजरा करणार आहोत. या दिवसाचे औचित्य साधून बदलत्या हवामानाविषयी पर्यावरण विषयक जनजागृती करण्यासाठी “स्वागत भारतीय प्रजासत्ताक दिनाचे... ध्येय समृध्द पर्यावरणाच्या रक्षणाचे” या उपक्रमांतर्गत राज्यातील शालेय विद्यार्थ्यांना समृध्द पर्यावरणाची शपथ देण्याचा कार्यक्रम पर्यावरण विभाग व महाराष्ट्र प्रदूषण नियंत्रण मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने वराज्याच्या शालेय शिक्षण विभागाच्या सहकार्याने आयोजित करण्यात येणार आहे. शपथ नमुना परिशिष्ट ‘ अ ’ मध्ये जोडला आहे.

२. सदरहू शपथ राज्याचे मा.मुख्यमंत्री हे देणार असून या वेळी अन्य मान्यवर उपस्थित राहणार आहेत. सदरहू उपक्रमाचे आयोजन दिनांक २२ जानेवारी,२०२० रोजी सकाळी १०.३० वाजता त्रिमुर्ती प्रांगण,मुख्य इमारत,मंत्रालय,मुंबई येथे करण्यात येणार आहे.

३. सदरहू उपक्रमाचे थेट प्रसारम मुंबई दूरदर्शन, इतर मराठी वृत्तवाहिन्या यांच्याकडून करण्यात येणार आहे. सदरहू उपक्रम राज्यभर एकाच दिवशी एकाच वेळी राबविण्यात येणार आहे. याबाबत राज्यातील सर्व प्राथमिक,माध्यमिक शाळांतील विद्यार्थ्यांना या समारंभास उपस्थित राहून राज्यातील शालेय विद्यार्थ्यांना पर्यावरण रक्षणाच्या चळवळीत सहभागी होण्यासाठी आयुक्त (शिक्षण),पुणे यांनी प्रोत्साहन द्यावे व त्याबाबत सर्व शाळांच्या मुख्याध्यापकांना अवगत करावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२११७०२२७७५२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.01.21 17:03:45 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
२) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,
३) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे,
४) राज्य प्रकल्प संचालक,महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई
५) संचालक,महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद ,पुणे
६) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे,
७) शिक्षण संचालक (प्राथमिक) ,शिक्षण संचालनालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
८) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक ,
९) प्राचार्य,जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण विकास संस्था (सर्व),
१०) शिक्षणाधिकारी(प्राथमिक/माध्यमिक/निरंतर), जिल्हा परिषद (सर्व) /सर्व शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई महानगरपालिका,
११) प्रशासन अधिकारी (महानगरपालिका/नगरपालिका) (सर्व),
१२) निवड नस्ती (कार्या.एस.डी.४)

# परिशिष्ट-अ

## शपथ

## स्वागत भारतीय प्रजासत्ताक दिनाचे.... ध्येय समृद्ध पर्यावरणाच्या रक्षणाचे.

भारतीय प्रजासत्ताक दिनाच्या निमित्ताने मी आज संकल्प व निश्चय करतो की, माझ्या दैनंदिन जीवनशैलीत मी पर्यावरणाचा ऱ्हास होणार नाही याची काळजी घेईन. याकरीता प्लास्टिक पिशवीचा वापर न करता कापडी पिशवीचाच वापर करेन. पाण्याचा प्रत्येक थेंब अनमोल आहे त्याची बचत करेन.

घरातील ओला व सुका कचरा वेगळा करेन व ओल्या कचऱ्याचे सेंद्रिय खत करेन. माझ्या सभोवतालच्या नैसर्गिक जलस्त्रोंताचे म्हणजे विहिरी, तळे, नदी अशा पाणवठयांचे प्रदूषण होणार नाही याची काळजी घेईन.

मी असे वचन देतो की, नैसर्गिक अधिवासात वास्तव्य करणारे प्राणी, पक्षी, जलचर व जैव वैविधता याचे मी संरक्षण करेन.

आम्ही असा संकल्प करतो की, समृध्द पर्यावरणाच्या रक्षणाकरीता मी वाढदिवसाला किमान एक झाड लावेन व त्याचे नित्यनियमाने संगोपन करेन.

आम्ही भारतीय प्रजासत्ताकाचे सर्व विद्यार्थी व सर्व सुजाण नागरिक शपथ घेतो की आजपासुन मी पर्यावरणपुरक दैनंदिन जीवन व्यतीत करण्याचा निश्चय करीत आहोत.

*******************************************************************************************